‘ग्रामपंचायतीला जन सुविधासांठी विशेष अनुदान’ या जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत ग्रामपंचायत कार्यालयाच्या इमारत बांधकामासाठी सुधारीत निधीबाबत

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः जनसु-२०१५/प्र.क्र.५९/यो-६**
**बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१**
**दिनांक: ३१ ऑक्टोबर, २०१५**

**वाचा §**

१) ग्रा.वि.व ज.सं.वि.शासन निर्णय क्र. ददभू-२०१०/प्र.क्र.६२/यो-६,दि.१६ सप्टेंबर,२०१०.

२) ग्रा.वि.व ज.सं.वि.शासन निर्णय क्र. ग्रापंई-२०१३/प्र.क्र.१८९/पंरा-७,दि.३०जानेवारी, २०१४.

**शासन निर्णय§**

“ग्रामपंचायतीला जन सुविधांसाठी विशेष अनुदान” या जिल्हास्तरीय योजनेंतर्गत ग्रामपंचायत भवन/ कार्यालय व इतर सुविधा पुरविण्यासाठी संदर्भाधिन अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये एका गावाकरीता रू. १०.०० लक्ष इतका निधी मंजूर करण्यात येत होता. तथापि, संदर्भाधिन अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये ग्रामपंचायत कार्यालयाच्या इमारत बांधकामासाठी सुधारीत आराखड्यानुसार रू. १२.०० लक्ष इतक्या निधीस मान्यता देण्यात आली आहे. त्यामुळे ग्रामपंचायतीला जन सुविधांसाठी विशेष अनुदान या योजनेंतर्गत ग्रामपंचायत कार्यालय बांधकाम करणे यासाठी रू. १२.०० लक्ष इतका निधी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. ग्रामपंचायत कार्यालयाची इमारत बांधकामासंबंधी संदर्भाधिन अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये आराखडा व सविस्तर सूचना देण्यात आलेल्या आहेत. सदर सूचनांची अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०३०१२२७१३०८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Nathlya Valvi

Digitally signed by Prakash Nathlya Valvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Nathlya Valvi
Date: 2015.10.31 11:48:11 +05'30'

प्रकाश वळवी
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री व राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
४. मा. विधानसभा व मा. विधानपरिषद सदस्य.
५. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
६. सर्व मंत्रालयीन विभाग
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर.
८. महालेखापाल (लेखापरीक्षा) मुंबई/ नागपूर.
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०.सर्व जिल्हाधिकारी.
११.सर्व सहसचिव/ उपसचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग.
१२.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१३.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
१४.निवड नस्ती, कार्यासन योजना-६.